**राज्यसेवा परीक्षा, २०२२ च्या अंतिम निकालाद्वारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या शिक्षणाधिकारी व तत्सम, गट अ संवर्गातील उमेदवारांच्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) कालावधीकरीता ०१ अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-ससप्रे-४४२४/प्र.क्र.२५८/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक:- २० मार्च, २०२५.

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा १, दि.२०.०२.२०१६
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. बिंदूना ३०१६/ प्र.क्र.२००/प्रशा-२, दि.१७.११.२०१७
४) सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र. क्रमांक-टिआरएन-११२४/प्र.क्र.७५/प्रशि ३, दि. २१.११.२०२४.
५) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन ११२४/प्र.क्र.७५/प्रशि २, दि.२१.०२.२०२५
६) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन ११२४/प्र.क्र.७५/प्रशि २, दि.१२.०३.२०२५
७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, समक्रमांक दि. १३.०३.२०२५

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळ सेवेने नियुक्त होणाऱ्या गट- अ मधील पदांसाठी यशदा प्रशिक्षण संस्था, पुणे या संस्थेमार्फत व गट ब मधील पदांसाठी वनामती प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने शिक्षणाधिकारी व तत्सम, गट अ संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षा-२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या शिक्षणाधिकारी व तत्सम, गट अ संवर्गातील अधिकाऱ्यांना प्रशिक्षणार्थी अधिकारी म्हणून नियुक्ती देण्यात आली असून त्यांचे प्रशिक्षण एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) अंतर्गत यशदा प्रशिक्षण संस्था, पुणे येथे दि.०२.०४.२०२५ पासून सुरु होत आहे. सदर प्रशिक्षणासाठी प्रत्यक्ष उपस्थित झालेल्या उमेदवारांच्या संख्येच्या मर्यादेत अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये सूचना निर्गमित केल्या आहेत. सीपीटीपी-१० अंतर्गत (गट-अ) संवर्गातील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या सेवाविषयक बाबींची पूर्तता करण्यासाठी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे यांना नोडल अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात आले आहे. याबाबत संदर्भ क्र. ६ येथील पत्रान्वये १८ अधिसंख्य पदे निर्माण करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षा-२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील शिक्षणाधिकारी व तत्सम, (गट-अ) संवर्गात निवड झालेल्या २० उमेदवारांपैकी १८ उमेदवार प्रशिक्षणासाठी यशदा प्रशिक्षण संस्था, पुणे येथे हजर होणार आहेत. उर्वरित ०१ उमेदवाराचे नियुक्ती आदेश संदर्भ क्र. ६ येथील कार्यालयीन आदेशान्वये सामान्य प्रशासन विभागाद्वारे निर्गमित करण्यात आले आहेत. त्यानुसार शिक्षणाधिकारी म्हणून प्रत्यक्ष रूजू होणाऱ्या ०१ उमेदवारांकरिता ०१ अधिसंख्य पद दिनांक २ एप्रिल, २०२५ पासून पुढे दोन वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्याकरिता संदर्भ क्र.५ येथील नियुक्ती आदेशातील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर ०१ अधिसंख्य पद शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील शिक्षण आयुक्त, पुणे यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. शिक्षण आयुक्त, पुणे यांच्या आस्थापनेवरील शिक्षणाधिकारी व तत्सम, (गट-अ) संवर्गातील सदर ०१ अधिसंख्य पदाच्या दोन वर्षांच्या कालावधीतील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या वेतनावर होणारा खर्च "२२०२ सर्व साधारण शिक्षण-८० सर्व साधारण ००१ संचालन व प्रशासन (००)(०१) शिक्षण संचालक अनिवार्य (२२०२१०९१)" या लेखाशिर्षा मधून भागविण्यात यावा व तो त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक ५ व ६ येथील आदेशान्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) साठी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार सदर प्रशिक्षणार्थी अधिकाऱ्यांची सेवार्थ प्रणालीमध्ये नोंदणी करणे, डीसीपीएस क्रमांक मिळविणे, त्यांच्या वेतनासाठी आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त करणे, परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षणाच्या पहिल्या महिन्यापासून संबंधित पदाचे नियमित वेतन प्रदान करणे, परिविक्षाधीन अधिकाऱ्याची सेवापुस्तके तयार करणे इ. कार्यवाही प्रशिक्षणाच्या सुरूवातीच्या ४ आठवडयात करण्याच्या सूचना आहेत. सबब, सदर परिपत्रकातील निर्देश विचारात घेऊन आवश्यक कार्यवाही नोडल अधिकारी म्हणून विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे यांनी करावी.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२०१५१६५८७९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2025.03.20 15:18:18 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०००२०.

२.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०००२०.

३.महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर

४.महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
५.अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६.आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
८.महासंचालक, वंसतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर-४४२४१०.
९.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे
११.कक्ष अधिकारी (प्रशा-५), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती.